सहायक कामगार आयुक्त, गट-अ (वेतन
मॅट्रीक्स स्तर एस-१८, रु. ४९१००-१५५८००)
या पदावर पदोन्नती देणेबाबत.
श्री. विशाल वि. घोडके, सरकारी कामगार
अधिकारी,गट-ब

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-२०१८/प्र.क्र.१६६/कामगार-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०७ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/कार्यासन-१२, दि.१५.१२.२०१७
२) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२A/१६-ब, दि.२९.१२.२०१७
३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन आदेश क्र. न्यायाप्र-२०१६/प्र.क्र.२७/कामगार-८, दि.१९.०९.२०१९
४) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन आदेश क्र. एसीबी-२०१५/प्र.क्र.१५०/कामगार-८, दि.२०.०१.२०२०

**प्रस्तावना:**

कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सरकारी कामगार अधिकारी, गट-ब संवर्गातील श्री. विशाल वि. घोडके हे सन २०१६-१७ च्या निवडसुचीतून पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात होते. परंतु त्यांच्या विरुध्द विभागीय चौकशी सुरु असल्याने उपरोक्त अ.क्र. १ येथील नमुद सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५.१२.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार त्यांची पदोन्नतीची पात्रता तपासून विभागीय पदोन्नती समितीने केलेले मुल्यमापन आणि दिलेली प्रतवारी मोहोरबंद पाकिटात ठेवण्यात आली होती. त्यानंतर शासनाच्या उपरोक्त अ.क्र.३ येथील दि.१९.०९.२०१९ रोजीच्या आदेशान्वये त्यांची विभागीय चौकशी संपुष्टात आली असून त्यांची निर्दोष मुक्तता झालेली आहे. तसेच त्यांचा निलंबन कालावधी शासनाच्या उपरोक्त अ.क्र. ४ येथील दि.२०.०१.२०२० रोजीच्या आदेशान्वये कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्यात आलेला असल्याने त्यांना सहायक कामगार आयुक्त, गट-अ या पदावर पदोन्नती देणे आवश्यक होते. त्यानुषंगाने श्री. घोडके यांचे मोहोरबंद पाकीट अपर मुख्य सचिव

(कामगार) तथा अध्यक्ष, विभागीय पदोन्नती समिती यांच्या मान्यतेने उघडण्यात आले असून त्यांना विभागीय पदोन्नती समितीने पात्र ठरविले आहे. त्यानुसार सन २०१८-१९ च्या निवडसुचीतील सहायक कामगार आयुक्त, गट-अ या संवर्गातील पदोन्नती कोट्यात रिक्त असलेल्या खुल्या प्रवर्गातील पदावर श्री. घोडके यांना नियमित पदोन्नती देणे शासनाच्या विचाराधिन होते.

## शासन निर्णय:

कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सरकारी कामगार अधिकारी, गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या सेवाजेष्ठता यादीतील सेवाजेष्ठतेनुसार श्री. विशाल वि. घोडके यांना सहायक कामगार आयुक्त, गट-अ (वेतन मॅट्रीक्स, स्तर एस-१८, रु.४९१००-१५५८००) संवर्गात खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर या आदेशाव्दारे विहित अटींच्या अधीनतेने तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या पदावर त्यांची पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | ज्येष्ठता क्र. व मूळ प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना करावयाचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. विशाल वि. घोडके | २८८/ इ.मा.व. | खुला | कामगार उप आयुक्त यांचे कार्यालय,पुणे येथील श्री. चंद्रकांत राऊत, सहायक कामगार आयुक्त यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर | प्रशासकीय कारणास्तव |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी दिलेल्या अभिप्रायानुसार खुल्या प्रवर्गातील कर्मचा-यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे

निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सा.प्र.वि./कार्यासन १६-ब ने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत.

त्यानुसार सदर सरकारी कामगार अधिकारी, गट-ब यांना सहायक कामगार आयुक्त, गट-अ पदावरील पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

३. सदर सहायक कामगार आयुक्त पदावरील पदोन्नती उक्त अधिका-यांना त्यांच्याविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. संबंधित सरकारी कामगार अधिकारी यांनी सहायक कामगार आयुक्त पदावरील पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१२/०९/२०१६ नुसार त्यांचे नाव सन २०१८-१९ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणा-या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिस-या वर्षाच्या निवडसूचीत सहायक कामगार आयुक्त पदावरील पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.

५. हा आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४८२/२०२०/का.१२, दि.०९.०९.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००७१५०८५०८५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2020.10.07 15:10:39 +05'30'

**( डॉ. श्री. ल. पुलकुंडवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. सचिव (कामगार) यांचे स्वीय्य सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. कामगार आयुक्त, कामगार भवन,ई-ब्लॉक, सी-२०,वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पुर्व), मुंबई
४. अपर कामगार आयुक्त, कोकण/पुणे.
५. कामगार उप आयुक्त (प्रशासन), मुंबई
६. कामगार उप आयुक्त, पालघर/ठाणे/पुणे
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ पुणे
१२.श्री. विशाल वि. घोडके, सहायक कामगार आयुक्त (कामगार आयुक्त यांचेमार्फत)
१३.निवडनस्ती/कामगार-८.